GR-200408271529140001-0100

शासकीय कर्मचा-यांची नियत सेवावधीपूर्वी सेवानिवृ

वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे सेवेत रहाण्याची शासकीय कर्मचा-यांची पात्रापात्रता अजमाविण्याचा निकष...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १२ मे, १९८६.

संदर्भ:-[१] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०७७/पंधरा, दिनांक २ सप्टेंबर, १९७७.
[२] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दि. १ सप्टेंबर, १९८३.
[३] शासन परिपत्रक, क्र. एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दिनांक ३० नोव्हेंबर, १९८(

परिपत्रक

राज्य शासकीय कर्मचा-यांची वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे सेवेत रहाण्याची पात्रापात्रता अजमाविण्याचा सध्या अस्तित्वात असलेला निकष बदलण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने असा निर्णय घेतला आहे की,

[अ] वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी सेवेत असलेल्या वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या प्रकरणाचे सध्याप्रमाणे वयाची ५० वर्षे पूर्ण होतेवेळी किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी, यापैकी जे प्रथम घडेल तेव्हा, एकदाच पुनर्विलोकन करण्याची सध्याची पध्दती कायम ठेवण्यात यावी. मात्र सेवेत ठेवण्याचा निकष सध्याप्रमाणे शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "सर्वसामान्यापेक्षा कमी प्रतीचा नाही" असा अभिलेख या ऐवजी शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "चांगला" पेक्षा कमी नाही असा अभिलेख हा निकष विहित करण्यात यावा.

[ब] वयाच्या ३५ व्या वर्षानंतर सेवेत आलेल्या राजपत्रित अधिका-यांच्या बाबती वयाच्या ५५ व्या वर्षी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी सध्या अस्तित्वात असलेला "सर्वसामान्यापेक्षा कमी नाही" असा अभिलेख, शारीरिक क्षमता व निर्विवाद सचोटी हा निकष बदलून त्याऐवजी "चांगला" पेक्षा कमी नाही असा अभिलेख, शारीरिक क्षमता व निर्विवाद सचोटी हा निकष विहित करण्यात यावा.

[क] वर्ग ३ च्या कर्मचा-यांबाबत वयाच्या ५५ व्या वर्षी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी विहित केलेल्या सध्याच्या शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व सर्वसामान्यापेक्षा कमी नाही असा अभिलेख या निकषाऐवजी शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "चांगला"पेक्षा कमी नाही असा अभिलेख हा निकष विहित करण्यात यावा.

...२/-

[ड] वर्ग ४ च्या कर्मचा-यांबाबत वयाच्या ५५ व्या वर्षी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी सध्या शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व सर्वसामान्यापेक्षा कमी नाही असा अभिलेख हा निकष आहे. यातील "सर्वसामान्यापेक्षा कमी नाही" ही प्रतवारी गोपनीय अभिलेखांची प्रतवारी ठरविण्यासंबंधीच्या शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीएफआर-१२७७/५६२/१३, दिनांक ७ जुलै १९७७ मधील "साधारण" ह्या प्रतवारीशी जुळती आहे. तेव्हा वर्ग ४ च्या कर्मचा-यांबाबत करावयाच्या पुनर्विलोकनासाठी निकषामध्ये बदल न करता शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "साधारणपेक्षा कमी नाही" असा अभिलेख हा निकष विहित करण्यात यावा.

२. वरील प्रमाणे पुनर्विलोकन केलेल्या प्रकरणांतील एखाद्या अधिका-याचे/कर्मचा-याचे नंतरचे काम, वर्तणूक किंवा शारीरिक व मानसिक क्षमता लक्षात घेता त्याची मुदतपूर्व सेवानिवृत्ती करणे स्पष्टपणे समर्थनीय वाटल्यास अशा प्रकरणाचे केव्हाही पुनःपुनर्विलोकन करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. अशी प्रकरणे हुडकून काढण्याची जबाबदारी विभाग प्रमुखांवर राहील. या संदर्भात त्यांनी शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/१५, दिनांक १ सप्टेंबर, १९८३ च्या आदेशांचे अनुपालन करावे.

३. ज्या अधिकारी/कर्मचा-यांच्या प्रकरणाचे ५०/५५ व्या वर्षाचे पुनर्विलोकन अद्याप केलेले नाही व ज्या प्रकरणाचे यापुढे पुनर्विलोकन करावयाचे आहे त्या सर्व प्रकरणांचे पुनर्विलोकन करताना वर [अ], [ब] व [क] येथे निर्देश केलेल्या बदललेल्या निकषांच्या आधारे ते करणे आवश्यक आहे.

४. गोपनीय अभिलेखांची प्रतवारी ठरविण्याबाबतचे शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीएफआर-१२७७/५६२/१३, दिनांक ७ जुलै, १९७७ ची प्रत सोबत माहितीसाठी जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
ग. गं. देलवलकर,
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहायक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व सचिव,
मंत्रालयाच्या विभागांतर्गत सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
निवड फाईल,